मागील अध्यायात अग्निपुत्र जालिंदराची जन्म कथा आपण जाणून घेतली. जालिंदराची विरक्ती आणि जन्मदात्या अग्नीदेवतेची भेट झाल्यावर अग्नीदेवांनी त्याला श्रीगुरुदत्तांकडे आणले आणि त्याला सर्व विद्या कला पारंगत करण्याची प्रार्थना त्यांच्याकडे केली. बारा वर्षांच्या कालावधीत जालिंदर सर्व शास्त्रात आणि कलांत निपुण झाला. श्री दत्तात्रेयांच्या आव्हानाला प्रतिसाद देत सकल देवदेवता जालिंदरास शुभाशिर्वाद आणि वर देण्यास उपस्थित राहिले आणि इष्ट कार्य संपल्यावर स्वस्थानी निघून गेले. त्यानंतर बद्रीनाथांनी अग्नीदेव आणि जालिंदरास एक विलक्षण घटना ऐकविली. ब्रह्मदेवाच्या प्रमादामुळे हिमालयाच्या अरण्यात पहुडलेल्या महाकाय हत्तीच्या कानात प्रबुद्धनारायण सजीव असून त्याला बाहेर काढून स्वतःचा शिष्य म्हणून त्याचा स्वीकार कर असे जालिंदरास सांगितले. पराक्रमी जालिंदराने हत्तीच्या कानातून प्रबुद्धनारायणास बाहेर काढले आणि श्रीशिवाने सांगितल्याप्रमाणे त्याचे कानिफ असे नामकरण केले. जालिंदराने श्रीदत्तात्रेयास विनंती करून विद्यावंत, कीर्तिवंत करण्याचे साकडे घातले. श्री दत्तात्रेयांनी त्याची इच्छा पूर्ण केली. पण कानिफास आशीर्वाद आणि वरदान देण्यावरून देव आणि जालिंदर यांच्यात नाहक वाद निर्माण झाला. आणि समरप्रसंगात देवांची नामुष्की झाली. पण कानिफनाथाच्या चातुर्याने प्रसंग निभावला.

हिमालायामाधील श्रीशिवाच्या वास्तव्यस्थानी म्हणजे बद्रिकाश्रमात श्रीहरि, श्रीहर, जती जालिंदर आणि कानिफ यांच्या हास्यविनोदाची मैफल रंगात आली होती. देवतांची फजिती आठवून आठवून प्रत्येक जण मनमुरादपणे हसत होता. चर्चा अशी होती, “देव तरी किती विक्षिप्तपणे वागले? प्रथमतः हात जोडून नम्रतेने विनंती केली, तेव्हा ताठरपणे वागले आणि नंतर उलटे टांगून वस्त्रहीन केले तेव्हा प्रसन्न झाले आणि शुभाशिर्वाद आणि वर देऊन निसटले. खरं तर या पराक्रमी देवांनी अनेक बलाढ्य अशा दैत्याशी संग्राम करून त्यांचा पडाव केला आहे पण जालिंदरासारखा महापराक्रमी दोन हात करण्यासाठी प्रथमच भेटला असावा. खाली डोके आणि वर पाय अशा नग्नावस्थेत वटवाघुळासारखे लटकून धरणीकडे पहात होते. अशी वेळ कुणावरही आली नव्हती.” अशी देवांची चेष्टा करीत पुन्हा पुन्हा हसून एक दुसऱ्यांना दाद देत होते.

श्रीशिव सदाशिव मध्येच चर्चा थांबवित म्हणाले, “असो! आता हास्यविनोद सोडून मी सांगतो तिकडे लक्ष्य द्या. जती जालिंदरा!! या कानिफाला नागअश्वत्थ वृक्ष पूजा यज्ञ करावयास सांगून वरप्राप्ती करून दे. तत्पूर्वी मंत्रकाव्य रचना करावी. हे होणे ही नितांत आवश्यक आहे. कारण पुढे कलियुगात वेद, मंत्र, अस्त्र, शस्त्रविद्या, क्षीण होऊन नष्टप्राय होईल. मग लोकांचे दुःख दूर करण्याचा मार्ग उरणार नाही. मानव जात दुःखी होईल. त्यांचे दुःख दूर करण्यासाठी तर नाथपंथीयांचे अवतार आहेत. त्यासाठी आताच मंत्र काव्य निर्मिती करून, नागाअश्वत्थ वृक्ष पूजन, काव्यसिद्धी करावी. म्हणजे कलियुगात अडचण येणार नाही. कानिफाकडून हे सर्व करवून घ्यावे. या कानिफाचे औदार्य आणि स्वाभिमान हे गुण नाथपंथ कार्यासाठी वरदानच ठरतील. हा प्रख्यात योगी होईल. अपार शिष्य परिवार वाढवील. उदंड कीर्ती आणि प्रतिष्ठा प्राप्त करील. याने शाबरी विद्या आत्मसात करावी, फार पूर्वी सांबरी ऋषींनी अशी आपदानिवारक काव्य रचना केली होती पण काही अपूर्णता आणि मंत्रांची अनुपलब्धता यामुळे म्हणावी तशी प्रसिद्धी लाभली नाही.

तुम्ही नाथपंथीयांनी शाबरी विद्येचे पुनरुज्जीवन करून शंभर कोटींपेक्षा जास्त शाबरी रचना केल्या पाहिजेत. कोणाकडून किती रचना व्हावी याची मी स्थूलमानाने अपेक्षा केली आहे ती सुद्धा समजून घ्या. मच्छिंद्राकडून तेहतीस

कोटी पंचावन्न लक्ष, गोरक्ष बारा कोटी नऊ लक्ष, रेवण दोन कोटी तीन लक्ष, वटसिद्ध कडून एक कोटी एक लक्ष, जालिंदर कडून चौतीस कोटी बारा लक्ष, कानिफाकडून सहा कोटी आठ लक्ष एवढी काव्य रचना व्हावी. कारण पुढे कलियुगात हे जमणार नाही. तरी जन उपकारासाठी स्वतः क्लेश सहन करून लोकांना सुखी केले पाहिजे, हे तुम्हा सुज्ञ नाथांना सांगण्याची गरज नाही कारण प्रत्येक कलियुगात आपण नऊ नाथ अवतार घेऊन अशी काव्यरचना करीत आलेलाच आहात. तरी आता या युगाच्या कार्याचा आरंभ करावा. बारा वर्षे तुम्ही दोघांनी येथे राहून काव्यरचना करावी आणि त्यानंतर कानिफाला बारा वर्षांच्या तपसाधनेसाठी येथेच बसावे." श्रीशिवाच्या धोरणांशी सहमती दर्शवून, जालिंदर आणि कानिफाला आशीर्वाद देऊन श्रीहरी वैकुंठात गेले.

हरी हरांच्या आदेशान्वये गुरु आणि शिष्याने तेथे बारा वर्षे राहून चाळीस कोटी वीस लक्ष मंत्र संख्येचे उद्दिष्ट पूर्ण केले. ती बहुमुल्य आणि लोकोपयोगी काव्यरचना पाहून श्रीशिव संतुष्ट झाले आणि ते सिद्ध करण्यास सांगितले. त्याप्रमाणे दोघा गुरुशिष्यांनी सूर्यकुंडातील पाण्याने नाग अश्वत्थ वृक्षावर सिंचन करून, सर्व देवतांना वश करून शाबरी काव्य सिद्धीची प्रक्रिया पूर्ण केली. त्यानंतर बद्रीकावनांत परतून श्री आदिनाथांच्या साक्षीने कानिफाला तपाला बसविले. अन्नपाणी वर्ज, केवळ वायुभक्षण. आकाशकडे दृष्टी खिळवून, डाव्या पायाचा अंगठा तीक्ष्ण आणि टोकदार अशा लोखंडी खिळयावर ठेवून ईश्वर चिंतन करीत बारा वर्षांची तपश्चर्या सुरु झाली. श्री बद्रीकेदार त्याची काळजी घेऊ लागले. जती जालिंदर तीर्थस्थानांच्या निमित्ताने भ्रमंतीस निघाले. विशेष म्हणजे या बद्रीकावनातच भागीरथी नदीच्या काठावरील घनदाट अरण्यात गोरक्षनाथांचीही तपश्चर्या सुरु होतीच. तेथून जवळच कानिफनाथांचेही तप सुरु झाले. आदिनाथांनी गुप्तता पाळल्याने दोघांनाही परस्परांची माहिती नव्हती.

तीर्थयात्रा भ्रमंती करताना जालिंदरनाथांनी एका नियम बंधनात स्वतःला बद्ध केले होते. तीर्थाटन मार्गावरील गावात प्रवेश करण्यापूर्वी रानातून गवत कापून त्याचा भारा डोक्यावर घेऊन जावयाचे आणि ते गवत गाईंना खायला घालायचे. हा नित्य परिपाठ असायचा. जालिंदराचा पिता अग्नीदेव आणि अग्नीचा पिता वायुदेव असल्याने अग्नीने वायुस, "तात! आपला नातू शिरावरून गवताचे भारे वाहून गाईगुरांना नित्यनेमाने भरवीत आहे. त्याचे श्रम पाहून मनाला अतिशय क्लेश होतात. त्याच्या शिरावरील तृणभारा वरच्यावर आधांतरी धरल्यास तुमच्या नातवावर कृपा होईल!" अशी प्रार्थना केली. अग्नीदेवाच्या प्रार्थनेशी सहमत होत वायूदेवाने कृती आचरणात आणली. त्या क्षणापासून वायुदेव जालिंदरनाथांच्या डोईवरील ओझे वरच्यावर तोलून धरीत असत.

विविध तीर्थक्षेत्रांची यात्रा करीत जालिंदरनाथ गौड बंगाल देशातील हेलापट्टण नगरीत आले. डोईवर आधांतरी अवस्थेत तरंगणारा गवताचा भारा होता. ते दृश्य पाहून लोक थक्क होऊन चर्चा करू लागले. "हा काय चमत्कार आपण पाहत आहोत? हा साधुमहाराज नक्कीच कोणीतरी अवतारधारीच असला पाहिजे?" या दृश्याचा परिणाम असा झाला की रस्त्यावरील येणारे जाणारे लोक भक्तिभावाने नाथांच्या पाया पडत, नाथांना ते आवडत नव्हते कारण प्रतिष्ठा अप्रतिष्ठा मानअपमान अशा भावभावनांपासून त्यांनी मुक्ती मिळवली होती. बृहस्पतीप्रमाणे प्रज्ञावंत असणाऱ्या जालिंदरनाथांनी लोकसंपर्क आणि प्रसिद्धी टाळण्यासाठी मुद्दाम वेड्याचे सोंग घेऊन आपण फार क्रुद्ध आहोत अशी देहबोली प्रदर्शित केली होती. दगडफेक करणे, अंगावर धावून जाणे, मारण्यासाठी हातवारे करणे असे करीत लोकांना घाबरवीत असत. गाईंना गवत खायला घालून मग दुर्गंधीयुक्त घाणेरड्या बकाल गल्ली बोलीत जाऊन बसत. पोटापुरती भिक्षा मागून उदरनिर्वाह करीत.

या हेलापट्टण नगरीत त्रिलोचन पुत्र, महाराज गोपीचंद राजा राज्य करीत होता. हा राजा सद्गुणी, बलवान आणि पराक्रमी असा होता. कुबेरासारखा धनवान होता आणि मदनासारखा रूपसुंदर होता. त्याच्या पदरी अफाट सेना होती. अश्वदलात बारा लक्ष एवडे अश्व खोगीर कसून सुसुज्जत होते. गजदलही त्याचप्रमाणे बलशाली होते. गजमाथ्यावर नक्षीकाम आणि शुभ्र दंतसूळक्यात सुवर्णाची कंकणे, पाठीवर रंगबेरंगी झुली झालरी घालून हौदे, मेघडंबरी, सुवर्ण अंबाऱ्या चढवून सज्ज होते. अंबाऱ्यांवर विजयीपताका फडकत होत्या. पायदलात दहा सहस्त्र वीर सैनिक होते; छडीदार, चोपदार, बोथाटे, पुकारदार अश्वस्वार राजाच्या सेवेसाठी धावपळ करीत होते. एवढ्या प्रचंड सैन्यबळाच्या भयापोटी कुणी शत्रू आक्रमण करावयास धजत नव्हता. अशा या वैभवशाली राजसिंहासनावर रूपसंपन्न गोपीचंद राजा शोभायान होता. त्याल चंद्र म्हणावे तर चंदावर डाग आहे. सूर्य म्हणावे तर सूर्यात आग आहे. वीज म्हणावे तर विजा भ्याडांसारख्या ढगाआड लपतात. गोपीचंदमध्ये अशी कोणतीही न्यूनता नव्हती. तो दिव्यरूपधारी, सद्गुणी, धर्मपालक उदार सौभाग्यशाली, पराक्रमी शूर वीर होता. व्यायामामुळे कसलेला देह आणि मल्लविद्येतील असामान्य कौशल्यामुळे एकावेळी अनेक मल्लांशी एकटा लढून त्यांना पराभूत करीत असे. त्याला सोळाशे लावण्यवती राण्या होत्या. नक्षत्रांसारख्या सुंदर, कमलनयनी, मृगनयनी, रवंज पक्षाच्या अतिशय सुंदर डोळ्यांइतकी शोभायमान नेत्रावती राण्या! त्या रूप सौदार्यांगना पुढे उर्वशी मेनका यांचे रुपसूद्धा गौण ठरावे. त्यांचा साजशृंगार पाहून सौदामिनीसुद्धा लज्जित होत असे. अशा सोळाशे नक्षत्रवतींमध्ये राजा गोपीचंद कंठमण्यासारखा शोभत असे.

ह्या गोपीचंद महाराज्याची माता मैनावतीने, एक दिवस सज्जत उभी असताना राजमार्गावरून डोईवर आधांतरी गवताचा भारा घेऊन चाललेला जालिंदरनाथ पहिला. जन्मतः तेजस्वी असणारा अग्नीपुत्र जालिंदर योग शक्तीच्या सात्विक तेजाने अधिकच वलयांकित वाटत होता. राजमाता हे दृश्य पाहून चक्रावली. "ह्या तपस्वी युवकाने गवताच्या भाऱ्याला हातांनी आधार न देऊनही माथ्यावर अधांतरी हा भारा कसा काय तरंगत आहे? आश्चर्यच नव्हे काय! खात्रीने हा योग शक्तीने परिपूर्ण अशा बृहस्पती, शुक्राचार्य, गणगंधर्व, सुरवर, ब्रह्मा, विष्णू, महेश अशांपैकी कुणीतरी सिद्ध पुरुषच असावा. अशा अवतारी महात्म्याची भक्ती करून त्यांस प्रसन्न करून ह्या देहाचे सार्थक करून घ्यावे. काही ना काही ईश्वरी लाभ नक्की होईलच! अशा प्रकारचे चिंतन मनात चालू असताना तिने टाळी वाजवून दासीला बोलाविले. सेविका हजर होताच राजमाता मैनावती म्हणाली, "माझ्या मनात एक विचार आला असून ते काम अतिशय गुप्तपणे पार पडले पाहिजे. यांचा गवगवा झाल्यास आपण नाहक संकटातही सापडू शकतो.! राजपथावरून जाणारा तो साधू पाहिलास? आता जरा त्याला बारकाईने बघ." दासीने ते दृश्य पाहताच आपले नेत्र विस्फारले. आश्चर्यचकित होऊन ती म्हणाली, "महाराणी! हे तर मी नवलच बघते आहे, हा नक्कीच कोणीतरी सिद्ध योगी असावा, त्याचे तेजःपुंज व्यक्तिमत्व पाहून पृथ्वीवर सूर्य उगवल्याचाच भास होत होता. स्वर्गातून किंवा सत्यलोक, तापोलोकातून भूलोकी अवतारतात. हा श्रीहरी किंवा श्रीहर असावा. अशा अवतारी महापुरुषाची कुर्पादृष्टी झाल्यास, भवसागर पार होऊन उद्धारच होईल जन्माचा. जन्ममृत्युच्या चक्रातून कायमची मुक्ती!"

राजमाता मैनावती म्हणाली, "हा योगी कुठे राहतो ती माहिती गुप्तपणे काढ आणि त्वरेने मला कळव." राजमातेच्या आज्ञेप्रमाणे ती दासी गुप्तपणे जालिंदरनाथांच्या पाठलागावर रवाना झाली. नाथांनी गवताचा भारा सोडून गाईंना चार घातला मग अतिशय बकाल आणि दुर्गंधीयुक्त बोळात एकांती जाऊन बसले. लोकसंपर्कापासून दूर आणि निरव शांतता असलेल्या जागी ध्यानस्थ झाले. दासीने क्षणभर थांबून बारकाईने पाहाणी केली आणि सुसाट वेगाने ती राजमाते

सामीप पोहोचली आणि सांगितले, "दुर्गंधीयुक्त अशा घाणेरड्या बोळात ते योगीराज ध्यानस्थ होऊन बसले आहेत. त्या घाणीत मानवच काय तर डुक्करे आणि कुत्रीसुद्धा जात नाहीत. त्या घाणीत हा साधू एकटा पिशच्चासारखा बसला आहे." राजमाता म्हणाली, "ठीक आहे! आता ही गोष्ट कुठे बोलू नकोस. लोकांची वर्दळ थांबली आणि रात्री सामसूम झाली की आपण त्या साधूपुरुषाच्या भेटीस जाऊ."

यथावकाश मध्यरात्र झाली. नगरवासीयांवर निद्रेचा अंमल पुरेपूर चढला होता. सर्वत्र निरव शांतता आणि शुकशुकाट पसरला. अशावेळी राजमाता मैनाकिनी दासीला सोबत घेऊन निघाली, वेषांतर करून अंगावर कांबळे ओढलेले, हातात फुले, फळे, सात्विक नैवेद्याचे तबक घेतले आणि पहारेकऱ्यांच्या नजरा चुकवून गुप्त वाटेने स्वामीजींच्या स्थानाजवळ पोहोचल्या. पाहतात तर काय, स्वामीजी देहभान हरपून ईश्वर चिंतनात मग्न झाले आहेत. त्या दोघी नम्रतेने त्यांच्या चरणांवर लोटांगण घालीत हात जोडून म्हणाल्या, "योगीमहाराज! आम्ही प्रापंचिक त्रिविध तापांनी त्रस्त आहोत. यातना असंख्य आहेत. आम्हाला मुक्ती द्या आणि आमची सुटका करा. आमच्यावर द्या करा. ब्रह्मज्ञान देऊन या जन्ममरण्याच्या फेऱ्यांतून सोडवा."

राजमातेची अलौकिक आणि प्रामाणिक इच्छा ऐकून नाथांना परम संतोष झाला. तथापि त्यांच्या भक्तीची कसोटी पाहण्यासाठी उग्ररूप धारण करून पिशाच्चचेष्ठा आरंभली. शिव्यांची बरसात करून अभद्र बोलू लागले. हातात दगड घेऊन भिरकावून मारू लागले. पाषाणांचा मारा करून राजमाता आणि दासीला त्यांच्या निश्चयापासून प्रवृत्त करण्याचा प्रयत्न करू लागले, परंतु त्या दोघी धाडसी आणि दृढनिश्चयी होत्या. त्यांनी तर असाच विचार केला की या महापुरुषाच्या हातून मरण आल्यास मोक्षाची निश्चिती होईल म्हणून त्या मारहाण सहन करीत पाय घट्ट रोवून स्थिर उभ्या राहिल्या. सूतभरसुद्धा माघार घेत नव्हत्या. वज्रदेही असल्याप्रमाणे पाषाणाचा वर्षाव सहन करीत राहिल्या. त्यांची चिकाटी, सहनशक्ती पाहून नाथांनी हातातले दगड खाली टाकले आणि क्रुद्ध होऊन म्हणाले, "दुष्ट स्त्रियांनो! तुम्ही आहात तरी कोण? का म्हणून माझ्या पाळतीवर आला आहात? या घाण बोळात एकटाच निवांत, निःशब्द अवस्थेत बसलो असतानाही मला का त्रास देता? माझ्याकडे तुमचे काम तरी काय आहे? आम्ही परमेश्वरी भक्तीत व्यग्र राहणारे जोगी आहोत. माझे तपभंग करण्यासाठी आला आहात काय? कोण तुम्ही आणि तुमचा घरधनी कोण आहे?

यावर राजमाता अत्यंत धीराने उत्तर देत म्हणाली, "योगीराज! मी त्रिलोचन राजाची पत्नी आणि गोपीचंदची माता मैनावती!! मला साथ देणारी ही माझी सेविका आहे. माझे पती त्रिलोचन मरण पावल्यापासून मी वैधव्य भोगत मागे राहिले आहे. पती विरह आणि मृत्युच्या भयाने जीवन निरस वाटत असून मागे राहिल्याचा पश्चाताप होत आहे. माझ्या पतीचा जसा काळाने घास घेतला. तसा एक दिवस तो माझाही घेणार हे तर नक्कीच. त्यासाठी आपणच मला जन्ममृत्युच्या चक्रातून सोडवा, कृपा करा."

नाथ संतापाने उत्तरले, "तुझा पती मेला त्यावेळी तू सुद्धा का मेली नाहीस? कशाला मागे राहिलीस?" त्यावर महाराणी मैनावती म्हणाली, "साधूमहाराज! या देशाचा राजा गोपीचंद माझा पुत्र आहे. पुत्राच्या ममतेचे पाश तोडता आले नाहीत म्हणूनच स्वतःचे दुःख गिळून मुलासाठी जगात आहे. माझा मुलगा गोपीचंद हा पण तुमचा दास होईल. तरी आम्हाला मृत्यु भयापासून मुक्त करा."

मैनावातीची कळकळीची विनवणी ऐकून नाथ म्हणाले, “माई! जन्म आहे त्याला मृत्यु अटळ आहे. ते कसे चुकेल? चला निघा येथून, क्षणभर ही न थांबता घरी जा. तू तर राजमाता आहेस! अशा रात्री अपरात्री इकडे आल्याचे तुझ्या पुत्राला समजल्यास अनर्थ ओढवेल. तुम्ही निघा आता.” नाथांचे मन वळविता वळविता मध्यरात्र उलटली, पहाट झाली. पूजेचे ताट नाथांना अर्पण करून राजमाता दासीसह राजवाड्यात परतली. परंतु तिच्या मनाला शांतता नव्हती. दुःखाने जीव जळत होता. दुसरा दिवस मावळला आणि चंद्र माथ्यावर येताच पुन्हा वेषांतर करून दासीसह राजमाता जालिंदरनाथच्या त्या बकाल स्थानी आली. नाथांच्या चरणावर माथा ठेवून अश्रुंनी त्याचे चरण धुतले. त्यांनी झिडकारले तरीही मानहानी न समजता भक्तिभावाने त्यांचे पाय चेपीत राजमाता बसली. सव्वा दोन प्रहर उलटले. पहाट होताच त्वरेने राजवाड्यात परतली. अशी तहत सहा महिने राजमाता भक्तीभावाने सेवा करीत होती.

एका रात्री नाथांचे डोके मांडीवर घेऊन राजमाता नामस्मरण करीत होती. नाथांनी आज तिची कसोटीच घेण्याचा बेत आखला होता. नाथ गाढ निद्रेचे सोंग करीत घोरण्याचा आवाज काढत होते. त्यांनी निर्मित केलेल्या मायावी भ्रमराने राजमातेच्या मांडीला खालून चावा घेण्यास सुरवात केली आणि मांडी आरपार पोखरून, नाथांच्या मानेला हलकासा चावा घेऊन कार्य पूर्ण झाल्याचे सूचित केले. गुरुनाथांचा निद्राभंग होऊ नये म्हणून राजमाता मैनाकिनीने घट्टपणे ओठ मिटून अपार वेदना सहन केल्या, मांडी स्थिर ठेवली. जमिनीवर रक्ताचा ओघळ वाहू लागला. सहनशीलतेचा धैर्याचा आणि गुरुभक्तीच्या प्रचितीचा अनोखा अविष्कार त्या ठिकाणी साकारला होता. नाथांनी जागे होऊन तिच्याकडे प्रसन्न कृपादृष्टीने पाहून तिची मस्तक कुरवाळले. तात्काळ मैनावती राणीच्या कानात गुरुमंत्राचा उपदेश केला आणि अनुग्रह दिला. क्षणार्धात ती सज्ञान झाली. संजीवनी मंत्र सामर्थ्याने तिच्या मांडीला झालेली जखम बरी झाली. वेदनेचा आणि जखमेचा मागमूसही उरला नाही. महाराणी मैनावतीला ब्रह्मसाक्षात्कार झाला होता. अद्वैत साक्षात्काराने तिची समाधी लागली. संजीवनीने तिला अमरत्व मिळाले. गुरुभाक्तीने मृत्युचा पराभव झाला. देह भानावर आल्यावर तिने गुरु माउलींच्या चरणांवर भक्तीभावाने लोटांगण घातले.

नित्यनेमाने मैनावती गुरुसेवा करीत होती पुत्राच्या ममतेने तिच्यातील मातृत्व तळमळत होते. मनात विचार येत असत की भ्रमराने मांडीला आरपार छिद्र पाडून रक्ताचा पाट वाहत असताना केवळ गुरुकृपेने वेदना आणि जखम बरी होऊन तात्काळ दुःख नाहीसे झाले, हा माझा स्वानुभाव आहे. मला सज्ञान करून ब्रह्म साक्षात्कार घडवला आणि अमरत्वे मिळाले. अशाच प्रकारे माझा पुत्र गोपीचंद चिरंजीव झाला तर किती बरे होईल?”

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने स्त्री हत्येचा दोष नाहीसा होईल व पूर्वजांचा उद्धार होईल.